THE DEPARTMENT OF PUBLIC INSTRUCTION
CENTRAL PROVINCES

विद्याखातें, मध्यप्रदेश

७००९९

# मराठी दुसरें पुस्तक

# MARATHI SECOND READER

Second Edition




HUMPHREY MILFORD
OXFORD UNIVERSITY PRESS
BOMBAY
1918

# अनुक्रमणिका.

धडा १

# उसनी ऐट



एकदां एका डोमकावळ्याला मोराचीं पिसें सापडलीं. त्यानें तीं घेऊन आपल्या पंखांत खोंवलीं. त्याला वाटलें कीं आपण आता मोरच झालों. तेव्हांपासून तो आपले सोबती दुसरे डोमकावळे ह्यांबरोबर बोलेनासा झाला, व

मोरांच्या कळपांत जाऊन राहिला; पण मोरांनीं त्याला तेव्हांच ओळखलें. ते सर्व त्याचे आंगावर तुटून पडले; व त्यांनीं आपल्या चोंचींनीं त्यानें लावलेलीं सर्व पिसें उपटून काढून, त्याला आपल्या कळपांतून घालवून दिलें.

मग तो डोमकावळा परत आपल्या सोबत्यांकडे आला. तेव्हां सर्व डोमकावळे त्याला म्हणाले "कायहो महाराज, आपण मोर बनलां होतां ना ? आतां आम्हां गरीबांकडे कशाला आलां ? चला जा आपल्या नव्या सोबत्यांकडे" असें बोलून त्यांनींही त्याला घालवून दिलें. मग तो कावळा रानांत एकटाच राहूं लागला. खोटी ऐट केल्यामुळें त्याची अशी फजीती झाली.

---

धडा २

## संकटांतून सुटका.

एका पारध्यानें पक्षी धरण्याकरितां जमिनीवर आपलें जाळें पसरून तेथें तांदूळ टाकले;

व दूर जाऊन पक्ष्यांची वाट पहात उभा राहिला. इतक्यांत एक पारव्यांचा कळप वरून उडत चालला होता, त्यांनीं ते दाणे पाहिले, व सर्व पक्षी खालीं उतरले. ते दाणे खाण्याला जातात तोंच त्यांचे पाय जाळ्यांत अडकले.

हें पाहून पारध्याला फार आनंद झाला. आतां हे पारवे आपल्या हातांत सांपडल्या सारखेच आहेत, असें समजून तो अगोदर जवळच्या ओढ्यावर शिदोरी खाण्यास गेला. त्या पारव्यांच्या राजाचें नांव चित्रग्रीव असें होतें. इतरांबरोबर तोही जाळ्यांत अडकला होता. तो म्हणाला " हिरण्यक नांवाचा एक उंदरांचा राजा माझा मित्र आहे. आपण सर्वजण हें जाळें घेऊन त्याच्या घरापर्यंत उडून जाऊं; म्हणजे तो आपलें जाळें तोडून आपणांस सोडवील.

सर्वांना ही गोष्ट पसंत पडली; व ते सर्व जाळ्यासकट एकदम उडाले. हें पाहून पारधी घाबरला, व ते जिकडे उडाले होते, तिकडेच धांवूं लागला. परंतु पारवे लांब जाऊन त्यास

दिसतनासे झाले. तेव्हा तो निराश होऊन आपल्या घरीं गेला.

इकडे सर्व पारवे हिरण्यकाच्या बिळाजवळ उतरले. चित्रग्रीवानें हिरण्यकाला हाक मारून त्याला सर्व हकीकत सांगितली. हिरण्यकानें आपल्या सर्व उंदरांस जाळें तोडण्याचा हुकूम केला. त्यांनीं थोड्याच वेळांत जाळें तोडून सर्व पारव्यांस मोकळें केलें. नंतर हिरण्यकाचा व त्या उंदरांचा निरोप घेऊन सर्व पारवे आपापल्या घरीं गेले.

---

धडा ३

# निश्चयाचें फळ

सुमारें दीडशें वर्षांपूर्वी बाळशास्त्री पायगुंडे नावाचे एक मोठे पंडित होऊन गेले. त्यांच्या भाच्याचें नांव अनंत. आईबापांच्या लाडामुळें अनंत लहानपणीं ठोंब्याच राहिला होता; परंतु बहिणीनें फार आग्रह केल्यामुळें, शास्त्रीबोवांनीं

आपली मुलगी अनंतास देऊन, त्याला आपला जावई केला होता.

एकदा मेजवानीच्या वेळीं पानें वाढलीं, पण जावईबोवा जेवावयास न आल्यामुळें, इतरांना बसतां येईना. शास्त्रीबोवांनीं तपास केल्यावर त्यांना कळलें कीं, रुप्याचें ताट जेवायास नाहीं, म्हणून जावई रुसले आहेत. शास्त्रीबोवांचे घरीं पुष्कळ विद्यार्थी शिकावयास असत. त्यांपैकीं जे खरोखर हुशार व मेहनती असत, त्यांनाच जेवावयास रुप्याचीं ताटें मिळत, व तेच गुरुजीच्या पंक्तीला बसत. इतरांना जेवावयास केळीचीं पानें किंवा पत्रावळी मिळत; व ते निराळे बसत. सासूनें जावयाचा कैवार घेतला, असें पाहून शास्त्रीबोवा तिला म्हणाले, " तुझा जावई विद्वान नाहीं, त्याला रुप्याचें ताट द्यावयाचें असेल, तर त्याचें पान स्वयंपाकघरांत मांड; विद्वान शिष्य-मंडळीच्या पंक्तीला तें शोभणार नाहीं. "

हे शब्द अनंताच्या मनाला झोंबले; व तो लागलाच मुकाट्यानें आपल्या पानावर बसला.

पण त्याच वेळीं त्यानें असा निश्चय केला कीं, अभ्यास करून गुरुजींइतकें विद्वान व्हावयाचें. असा निश्चय करून, त्यानें तेव्हांपासून लक्ष लावून अभ्यास करण्याला सुरवात केली.

अखेरीस तो सासऱ्या इतका विद्वान झाला; व लोक त्याला अनंतशास्त्री म्हणूं लागले.

---

घडा ४

## मुलांची मौज

आपले बादशहा पांचवे जार्ज आणि महाराणी मेरी ह्यांचा राज्याभिषेक लंडन शहरीं इ० स० १९११ च्या जून महिन्यांत झाला. तेव्हां मुलांची जी चैन झाली, ती सांगतां येत नाहीं. एका मोठ्या राजवाड्यांत हजारों मुलांचा मेळा भरविण्यांत आला होता. त्यांत श्रीमंत व अगदीं गरीब अशा सर्वांचीं मुलें होतीं; व सर्वांची सारखीच सोय केली होती. बोलावलेल्या मुलांना खुणेसाठीं म्हणून एक कापडाचें रंगीबेरंगी फूल दिलें होतें.

मुलांना त्यांचे घरून राजवाड्यांत नेण्याची चांगली व्यवस्था केली होती. वाड्याच्या भव्य पटांगणांत जागजागीं नानाप्रकारचे खेळ व तऱ्हेतऱ्हेचे खाण्याचे पदार्थ ठेवले होते. मुलांनीं वाटेल तो खेळ खेळावा, व आवडेल तो पदार्थ खावा अशी बादशहांची परवानगी होती. मुलांची नीट व्यवस्था ठेवण्यासाठीं बादशहांचे पुष्कळ नोकर तेथें हजर होते. मुलांना कोणत्याही प्रकारें आडकाठी करूं नका असा बादशहांनीं त्यांना सक्त हुकूम केला होता.

बादशहांचा असा हुकूम ऐकल्यावर मुलांना फार आनंद झाला. कोणी मौजेनें नाचूं लागले, कोणी टोप्या उंच उडवून झेलूं लागले, कोणी निरनिराळे खेळ खेळूं लागले, कोणी मिठाई खाऊं लागले, व कोणी चहा पिऊं लागले. ह्याप्रमाणें सर्व मुलें खेळण्यांत व करमणूक करण्यांत दंग झालीं. राजाराणी साहेबांच्या स्वाऱ्या मेळा पहावयास आल्या. तेव्हां टाळ्यांनीं व आनंदा-

च्या उद्गारांनीं सर्व पटांगण दणाणून गेलें. मुलें तीं मौज कधींही विसरणार नाहींत.

---

धडा ९

# भलें पकडलें

एका शाळेच्या एका वर्गांतील बरींच मुलें आपल्या धड्याकडे लक्ष देत नसत. गुरुजी धडा समजावून सांगत असतां, कांहीं मुलगे एकमेकां-कडे पाहून हंसत; व कांहीं रस्त्यांतील गाड्यांकडे पहात. असें न करण्याबद्दल गुरुजींनीं त्यांना पुष्कळ सांगून पाहिलें,परंतु त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. मुलांची ही खोड नाहींशी व्हावी, म्हणून त्यांनीं एक गमतीची युक्ति योजिली. ते मुलांना म्हणाले "मुलांनो, तुम्हांपैकीं कोणाही मुलाला दुसरा मुलगा इकडे तिकडे पहातांना दिसला, तर त्यानें ताबडतोब ती गोष्ट मला कळवावी.

त्या वर्गांत सदाशिव नांवाचा एक मुलगा होता. त्याच वर्गांतील जगन्नाथ नांवाच्या मुलाचें

व त्याचें थोड्याच दिवसांपूर्वी भांडण झालें होतें. गुरुजींनीं सांगितलेली गोष्ट ऐकून सदाशिव मनांत म्हणाला, " आतां मी जगन्नाथाची चांगली खोड मोडीन; त्यानें इकडे तिकडे पाहिलें म्हणजे लगेच गुरुजींना सांगेन. " थोड्याच वेळानें त्याला जगन्नाथ रस्त्यांतील गाडीकडे पहातांना दिसला. लगेच तो उभा राहिला, व म्हणाला, " गुरुजी, आतांच जगन्नाथ रस्त्यांतील गाडीकडे पहात होता." गुरुजी म्हणाले " सदू, तुला ही गोष्ट कशी समजली ? " सदू म्हणाला, " गुरुजी, मीं आपल्या डोळ्यांनीं त्याला पाहिलें. " गुरुजी म्हणाले, " ज्या वेळीं तूं जगन्नाथाकडे पहात होतास, त्यावेळीं तुझें लक्ष तरी पुस्तकाकडे होतें काय ? " हें ऐकून वर्गांतील सर्व मुलें हसूं लागलीं, व सदू ओशाळून खालीं पाहूं लागला. पुन्हा त्यानें दुसरीं मुलें इकडे तिकडे पहातात कीं काय, हें पहाण्याचा प्रयत्न केला नाहीं.

---

घडा ६

# भाऊबीज.

दिवाळीचा सण भाउबीज आली ।
म्हणुनि गंगू आनंदमग्न झाली ॥
घरीं येतां आपुला भाउराया ।
झटे त्याचा सत्कार ती कराया ॥ १ ॥
किती त्याशीं भांडली याचमागें ।
किती लावुनि बोलली तया रागें ॥
किती वेळां धरियला अबोलाही ।
आज त्याचें नच भान तिला कांहीं ॥ २ ॥
भाउराया लाडक्या पहातांच ।
भरे प्रेमानें हृदय तिचें साच ॥
नव्या रंगीं बापुडी दंग झाली ।
पूर्ववर्तन विसरून सर्व गेली ॥ ३ ॥
तया मग ती आदरें स्नान घाली ।
कुंकुमाचा रम्य दे तिलक भालीं ॥
वरी मंगल अक्षता लावुनीयां ।
स्वयें ओंवाळी गंगु भाउराया ॥ ४ ॥
निज-प्रेमातें व्यक्त कराया ही ।

एक पुतळी तिस भाउराय देई ॥
प्रीति यानें का व्यक्त होय साची ? ।
परी केवळ समजूत ही मनाची ॥ ५ ॥
भाउराया बसवून भोजनास ।
करी गंगू आग्रह फार त्यास ॥
सुपक्कान्नें वाढुनी त्यास गोड ।
करी मनिंचें आपुल्या पुरें कोड ॥ ६ ॥
विनोदानें बोलतां चालतांना ।
एकमेकांशीं खेळ खेळतांना ॥
उभयतांतें चित्तांत धन्य होई ।
भाउबीजेचा सुदिन सुखें जाई ॥ ७ ॥

---

धडा ७

## कढीची पाळ

एकदां शिवाजी महाराज वेष पालटून दुसऱ्या प्रांतांतून फिरत असतां, त्यांचा मुक्काम एका बाईच्या घरीं झाला. त्यावेळीं महाराजांचा पोषाख अगदीं साधा असल्यामुळें, ते राजे आहेत ही गोष्ट बाईला कळली नाहीं. बाईनें स्वयंपाक

करून त्यांचें पान मांडलें. प्रथम भात वाढून मग कढी वाढली. पण ती वाहूं लागली; हें पाहून ती बाई म्हणाली "अहो असे कसे तुम्ही? पानावर कढी कशी संभाळावी हें देखील तुम्हांला कळत नाहीं. कढीच्या चारी बाजूंस भाताची चांगली पाळ बांधा, म्हणजे ती वाहाणार नाहीं. शिवाजी राजाही असाच आहे. तो एक किल्ला घेतो, व दुसरा गमावतो; त्याला आपल्या किल्ल्यांस नीट पाळ बांधतां येत नाहीं.

हें बोलणें महाराजांनीं मनांत ठेविलें, व उजाडल्यावर बाईचा निरोप घेऊन, ते आपल्या राज्यांत गेले. आपल्या किल्ल्यांचा नीट बंदोबस्त केल्यावर, ते पुन्हा त्या बाईच्या घरीं गेले; आणि मला कढीभात वाढ असें त्यांनीं तिला सांगितलें. तिनें कढीभात तयार करून त्यांचें पान वाढलें. पानावर कढी पडतांच महाराजांनीं चोहोंकडून भाताची पाळ बांधली; आणि म्हटलें "आतां तरी शिवाजी राजा किल्ल्यांस पाळ बांधण्याइतका हुषार झाला आहे किंवा नाहीं?"

हें ऐकून बाई चपापली. पण महाराजांनीं तिचें समाधान केलें. ते म्हणाले "तुमचे मजवर फार उपकार झाले आहेत. तुमचा पाळ बांधण्याचा उपदेश मी कधींही विसरणार नाहीं." एवढें बोलून त्यांनीं तिला मोहोरांची एक थैली बक्षीस दिली; आणि तिचा निरोप घेऊन ते राजधानीस परत गेले.

---

धडा ८

## पक्षीण आणि तिचीं पिलें

एकदां एका शेतांत एक पक्षीण आपल्या पिलांसह राहात होती. शेतकरी रोज शेत पहावयास येई, तेव्हां तो ज्या ज्या गोष्टी बोले, त्या सर्व ऐकून, पिलें आपल्या आईस रात्रीं सांगत असत. एके दिवशीं शेतकरी आपल्या चाकरांस म्हणाला "आतां लौकरच शेताची कापणी सुरू केली पाहिजे." ही गोष्ट पिलांनीं आपल्या आईस सांगितली; आणि तीं म्हणालीं "आई, चल. आपण आतांच येथून निघून जाऊं."

पक्षीण म्हणाली " मुलांनो येथून निघावयास अजून बराच अवकाश आहे. तुम्ही भिऊं नका, आणि शेतकरी उद्यां काय बोलतो तें नीट ऐकून मला सांगा. "

दुसरे दिवशीं पक्षीण आल्याबरोबर पिलांनीं तिला सांगितलें " आई, शेतकऱ्यानें शेत कापावयास आपल्या शेजाऱ्यांना उद्यां बोलाविलें आहे. " हें ऐकून पक्षीण म्हणाली " बाळांनो, कांहीं चिंता नाहीं, अजून बराच वेळ आहे. " तिसरे दिवशीं संध्याकाळीं पक्षीण आली, तेव्हां पिलांनीं तिला सांगितलें " आई, शेतकऱ्यानें शेत कापावयासाठीं आपल्या सोयऱ्याधायऱ्यांस बोलाविलें आहे. " तें ऐकून पक्षीण म्हणाली " कांहीं चिंता नाहीं, इतक्यांतच येथून जाण्याचें कारण नाहीं. " चवथे दिवशीं संध्याकाळीं पक्षीण आल्यावर पिलें म्हणालीं " आई, उद्यां शेतकरी आपल्या नौकरांना घेऊन स्वतः शेत कापणार आहे. " तेव्हां पक्षीण म्हणाली " आतां मात्र आपणांस गेलेंच पाहिजे. " असें बोलून उजा-

डण्यापूर्वींच ती आपल्या पिलांसह तेथून निघून गेली.

---

धडा ९

## मूर्ख का शहाणा ?

एकदां एका काजीनें एका पुस्तकांत असें वाचलें कीं, ज्याची दाढी लांब, व डोकें लहान असतें, तो मूर्ख असतो. त्याची दाढी लांब असल्यामुळें त्याला लांब दाढीचा काजी म्हणत, हें त्याला माहित होतें; व त्यानें आरशांत पाहिलें, तेव्हां आपलें डोकेंही बरेंच लहान आहे, असें त्यास दिसलें.

तो मनांत म्हणाला " मी मूर्ख का शहाणा ? पुस्तकांत लिहिल्याप्रमाणें तर मी मूर्ख ठरतों, व लोक मला हसतही असतील. परंतु मी खरोखर मूर्ख नसून, केवळ लांब दाढीमुळें ते मला मूर्ख समजतात. तेव्हां आतांच्या आतां दाढी आंखूड केली पाहिजे.

असा विचार करून तो घरांत कात्री शोधूं लागला; पण ती त्याला कोठें सांपडेना. मग त्यानें दिवा लाविला; आणि एका हातांत दाढीचा वरचा भाग धरून, खालचा भाग त्यानें पेटविला. त्यासरशी दाढी भुरभुर जळूं लागली. हात भाजल्यामुळें त्याला धरलेली दाढीही सोडणें भाग पडलें; त्यामुळें एका क्षणांत त्याची सर्व दाढी जळून गेली.

ह्याप्रमाणें त्या काजीस स्वतःच्या मूर्खपणाचा पुरावा ताबडतोब मिळाला; शिवाय दाढी जळ-ल्यामुळें त्याला चारचौघांत हिंडण्याची लाज वाटूं लागली.

---

धडा १०

## चंद्र आणि ढग

मुलगाः—चेंडूपरी दिसतसे नभिं काय आई ॥
डोळां दिसे क्षण न तोंच लपूनि जाई ॥
पृथ्वीवरी मधुन जों न उजेड येई ॥
अंधार तों चहुंकडे पसरोनि राही ॥ १ ॥

आई:—हा पूर्णचंद्र उगवे गगनांत बाळा ॥
तो चांदणें पसरुनी सुखवी जगाला ॥
रात्रंदिनीं झटुनि शांतवि हा धरेसीं ॥
काळोख होय ढग झांकि म्हणोन त्यासीं ॥२
मुलगा:—आई, अहा दिसत हा किति शोभिवंत ॥
लोकांस कष्टुनि सदा सुख फार देत ॥
वाटे न तो कधिंहि नावडता कुण्हाला ॥
हा द्वाड मेघ मग कां लपवी तयाला ॥३॥
आई:—वस्तू मिळे सतत जी सहजीं कुणाला ॥
भासे अमोलिकपणा न तिचा तयाला ॥
लोपे घडोघडिं शशी गगनांत जेव्हां ॥
त्याचा जगास कळतो उपयोग तेव्हां ॥४॥

सौ. शारदाबाई परांजपे

---

धडा ११

# हत्तीशीं सामना

एकदा शिवाजी महाराज गोवळकोंड्यास बादशहाचे भेटीस गेले होते. त्यांचे बरोबर यांचे कांहीं सरदार होते. एके दिवशीं महाराज व बाद-

शहा ह्यांच्या गोष्टी चालल्या असतां, बादशहानें विचारिलें "कांहो, शिवाजी राजे, तुमच्या जवळ किती हत्ती आहेत?" महाराज म्हणाले "बादशहा, आमचे जवळ अकरा हत्ती आहेत." बादशहा म्हणाला "तुमचा एखादा हत्ती आमचे हत्तीबरोबर लढूं शकेल काय?" महाराज म्हणाले "खात्रीनें लढूं शकेल."

हें ऐकून बादशहानें खरोखरच एक हत्ती समोरच्या चौकांत आणविला. तेव्हां महाराजांनीं राणोजी आंग्रे ह्यांस डोळ्यानें खूण केली. राणोजीनें दरबारी कपडे उतरून, एका हातांत वाघनख व दुसऱ्या हातांत पट्टा घेतला. आणि महाराजांस व बादशहांस मुजरा करून त्यानें चौकांत सिंहासारखी उडी मारली.

समोर हत्यारबंद माणूस पहातांच तो हत्ती चवताळला, व आंग्र्यांवर धावून आला. राणोजी चपळाईनें हत्तीच्या पोटाखालीं शिरला, आणि वळवळणाऱ्या सोंडेवर वाघनखाचा एक वार करून, तो पुन्हा हत्तीच्या समोर उभा राहिला.

हत्ती चवताळून पुन्हा त्याचे आंगावर धावला; तेव्हां त्यानें फिरून तसेंच केलें. ह्याप्रमाणें तीन वेळां करितांच हत्ती चिर्र असा शब्द करून बाजूला झाला.

नंतर हत्तीच्या सोंडेंत पट्टा देण्यांत आला; व तो हत्ती राणोजीचे आंगावर वार करूं लागला. राणोजीनें मोठ्या हुशारीनें हत्तीचे सर्व वार चुकविले; आणि शेपटीकडून पाठीवर चढून त्याचे मानेवर तो उभा राहिला. प्रथम वाघनखानें हत्तीला जेरीस आणून, त्यानें पट्ट्याच्या एकाच वारानें हत्तीची सोंड तोडली तेव्हां दरबारांतील सर्व लोकांनीं राणोजीची फार वाहवा केली. बादशहानें राणोजीला सरदार अशी पदवी देऊन एक लाखाची जहागीर दिली.

---

धडा १२

## जयजय रघुवीर समर्थ

सकाळची वेळ. यशवंतराव नांवाचे एक गृहस्थ आपलीं मुलें वसंत आणि यमू ह्याना घेऊन

ओसरीवर बसले होते. इतक्यांत दाराशीं एक साधू आले, व " जय जय रघुवीर समर्थ " असें मोठ्यानें म्हणाले. त्यांचे डोक्यास तांबुस रंगाचा



फेटा असून, त्यावर राम राम अशीं अक्षरें लिहिलीं होतीं. त्यांचे आंगांत पायघोळ कफनी होती, व हातांत कुबडी व बगलेंत झोळी होती.

वसंत म्हणाला " तात्या, हे बोवा कोण हो ? व ह्यांनीं असे भगवे कपडे कां घातले आहेत ?" यशवंतराव म्हणाले, " हे रामदासी बोवा." यमूनें विचारिलें, " ह्यांना रामदासी कां म्हणतात ?" यशवंतराव म्हणाले " सुमारें अडीचशें वर्षांपूर्वीं रामदास नांवाचे एक मोठे साधू होऊन गेले. त्यांचें मूळचें नांव नारायण. पण ते रामाची भक्ती करीत, व लोकांनाही तसेंच करावयास सांगत, म्हणून त्यांना रामदास स्वामी असें म्हणूं लागले. त्यांनीं लग्न केलें नव्हतें. रामाची भक्ती करणें, व लोकांना तसा उपदेश करणें ह्याच कामांत ते आपला सर्व वेळ घालवीत असत. लोक त्यांना फार मान देऊं लागले, व पुष्कळ लोक त्यांचे शिष्य झाले. रामदासांचे शिष्य म्हणून त्यांना रामदासी असें म्हणतात. रामदासी एकमेकांना भेटले, किंवा कोणाचे घरीं

भिक्षेला गेले म्हणजे " जयजय रघुवीर समर्थ " असें म्हणतात. रामदासी लोक बहुतकरून भगव्या रंगाचे कपडे वापरतात, व हातांत कुबडी बाळगतात.

---

धडा १३

## दोघांचें भांडण आणि तिसऱ्याचा लाभ

एकदां एक सिंह व आस्वल असे दोघे जंगलांतून चालले असतां वाटेंत त्यांना एक मेलेलें हरण दिसलें. त्यावर त्या दोघांच्याही उड्या पडून ते त्या करितां एकमेकांशीं भांडूं लागले. भांडतां भांडतां थोड्याच वेळांत ते रक्तबंबाळ होऊन खालीं पडले. त्यांना जागेवरून उठण्याची सुद्धां शक्ती राहिली नाहीं.

इतक्यांत एक कोल्हा तिकडून चालला होता. त्यानें सिंह व आस्वल मेल्यासारखे पडलेले पाहून हळूच हरणाला ओढून नेलें.

तें पाहून सिंह आस्वलाला म्हणाला " आपण हा केवढा वेडेपणा केला ! आपण एकमेकांशीं

लढलों आणि एकमेकांस जखमी केलें. आतां आपणांला उठण्याची सुद्धां शक्ती नसल्यामुळें, हा लुच्चा कोल्हा खुशाल हरण नेत आहे. आपण न भांडतां हें हरण वांटून घेतलें असतें तर किती बरें झालें असतें !

---

धडा १४

## मेलेलें जोडपें जिवंत झालें

पूर्वीं एका राजाचे पदरीं हसन नांवाचा एक मनुष्य होता. तो गमतीच्या गोष्टी सांगत असे. त्यामुळें राजा व राणी ह्या दोघांची त्यावर मर्जी बसली. राणीनें आपल्या एका दासीशीं त्याचें लग्न करून दिलें.

एकदां त्या दोघांजवळचे पैसे संपले. हसनाला राजाजवळ पैसे मागण्याची लाज वाटली, व त्याचे बायकोलाही राणीजवळ पैसे मागण्याचा धीर होईना. तेव्हां हसन खोटाच रडत रडत राजाकडे गेला. राजानें विचारलें " हसन कां रडतोस "? तेव्हां तो म्हणाला " महाराज

माझी बायको मेली." राजानें त्याला चार समजुतीच्या गोष्टी सांगून परत पाठविलें. हसन घरीं गेल्यावर त्याची बायको रडत रडत राणी-कडे गेली; व म्हणाली " सरकार, माझा नवरा मेला. आतां मी काय करूं ? " राणी म्हणाली " घाबरूं नको, मी तुझी सर्व तजवीज करीन " असें बोलून राणीनें तिला घरीं जावयास सांगि-तलें.

राजा व राणी ह्या दोघांची भेट झाली, तेव्हां त्या दोघांमध्यें वाद सुरू झाला. राजा म्हणे " हसनची बायको मेली " राणी म्हणे " हसन मेला. " शेवटीं खरें काय आहे, हें पाहाण्या करितां, दोघेंही हसनच्या घरीं गेलीं. राजा व राणी आपल्या घरीं येत आहेत असें पाहून, तीं दोघेंही मेल्याचें सोंग घेऊन जमिनीवर पडून राहिलीं. राजा व राणी तेथें आलीं, तेव्हां दोघेंही मरून पडलीं आहेत असें त्यांस दिसलें. तेव्हां आधीं कोण मेलें, ह्याबद्दलचा दोघांमध्यें वाद सुरू झाला. शेवटीं राजा म्हणाला "आधीं कोण मेलें

हें जो मला सांगेल, त्याला मी हजार रुपये इनाम देईन" तेव्हां हसन हळूच म्हणाला "महाराज मीच आधीं मेलों" असें बोलून तो एकदम उभा राहिला, व त्यानें राजाचे पायावर डोकें ठेविलें. त्याच्या बायकोनें राणीला नमस्कार केला. हें पाहून दोघांचींही हसतां हसतां पोटें दुखूं लागलीं. राजा म्हणाला "तूं मला असें कां फसविलेंस ?" हसन म्हणाला "महाराज, पैसे संपले होते म्हणून फसविलें" तेव्हां राजानें त्याला एक हजार रुपये खर्चासाठीं दिले, व पुन्हा असें करूं नको, अशी ताकीद दिली.

---

धडा १५

## सावली

( अच्युतं केशवं ह्या चालीवर )

एक आहे अशी सानुली सावली ।
जेथ जातों तिथें येत ती आपुली ॥
कोणती, कोठली ? ना कळे कायतें ।
भ्याड ही काय कीं ? ना मला सोडिते ॥१॥

मी उठें ती उठे मी बसें ती बसे ।
ना कधीं बोलते, ना हसे ना रुसे ॥
हो कधीं ती पुढें, ये कधीं पाठिशीं ।
ना कळे कायतें काम हीचें मशीं ॥ २ ॥
सूर्य जातां वरी सान ही होतसे ।
सान होतां पुढें गुप्त झाली दिसे ॥
ये पुन्हा उंच हो उंच ताडापरी ।
ना कळे काय हें गूढ आहे तरी ॥ ३ ॥
एकदां सुप्रभातीं फुलें तोडतां ।
मी वळोनी बघें तों दिसेना कुठें ॥
राहिली का घरीं जाउनी पाहतां ।
शोधतां भागलों ना दिसे ती कुठें ॥ ४ ॥
सूर्य येतां परी ती उभी ठाकली ।
मी पळें ती पळे मौजही वाटली ॥ ५ ॥

---

धडा १६

## रामटेक

हें प्रसिद्ध देवस्थान नागपुरापासून सुमारें पंचवीस मैलांवर आहे. नागपुरापासून रामटेका-

स आगगाडीनें जातां येतें. रामटेक हा गांव डोंगराच्या पायथ्याशीं आहे. डोंगराच्या रांगा ज्या ठिकाणीं मिळाल्या आहेत, तें ठिकाण सर्वांत उंच असून त्यावर रामाचें मंदिर आहे. डोंगराच्या पायथ्याशीं आंबाळा तलाव आहे. त्यांत स्नान केलें म्हणजे गंगेंत स्नान केल्याप्रमाणें लोक समजतात. येथून देवळापर्यंत दगडी पायऱ्या बांधलेल्या आहेत. गांवांतूनही गडापर्यंत अशाच पायऱ्या आहेत.

डोंगरावर एक लहानसें मैदान असून, त्याच्या सर्वांत उंच अशा भागास भव्य तटबंदी आहे. आंत लहान मोठीं पुष्कळ देवळें आहेत. त्यांपैकीं श्रीरामचंद्राचें, व त्याच्या मागें असलेलें लक्ष्मणाचें, अशीं दोन मुख्य आहेत. तटाच्या बाहेरही कांहीं देवळें आहेत. तट व देवळें ह्यांना सफेती दिलेली असल्यामुळें तीं बऱ्याच अंतरावरून सुद्धां स्पष्ट दिसतात.

गडावरील उंच गच्चीवरून पाहिलें असतां चोहोंकडचा देखावा मोठा रमणीय दिसतो.

पावसाळ्यांत भाताचीं शेतें हिरवीं गार दिसतात; आणि मध्यें असलेलीं लहान लहान तळीं आरशा-प्रमाणें चमकतात. गडाशिवाय आणखीही कांहीं स्थळें येथें पाहण्यासारखीं आहेत. तीं धूत-पापेश्वराचें शांत व रमणीय स्थान, खिंडशीचा विस्तीर्ण तलाव, आणि नागार्जुनाचें कोरीव देऊळ हीं होत.

---

धडा १७

## ऊंस

एक शेतकरी एकदां कडबा विकावयास बाजारांत गेला होता. परत येतांना त्यानें आपल्या मुलांसाठीं दोन मोठे ऊंस आणले. त्यांचे-आईनें उंसाचीं लहान लहान कांडकीं करून मुलांस खावयास दिलीं. मुलांना ऊंस फारच गोड लागला. मुलांपैकीं एक मुलगा बापाला म्हणाला "बाबा, यंदा एका वावरांत आपण ऊंसच पेरूं. पुढच्या बाजारांतून त्याचें चार पायल्या बीं आणाल काय ?" बाप म्हणाला " मुला,

उंसाचें ज्वारी सारखें बीं नसतें, व तो तसा पेरीतही नाहींत. शिवाय आपल्या वावरांत ऊंस चांगला होणार नाहीं." मुलगा म्हणाला "कां बरें? आपल्या वावरांत ज्वारी तर चांगली पिकते." बाप म्हणाला "उंसाला ज्वारीपेक्षां पाणी फार अधिक लागतें." मुलगा म्हणाला "बाबा, ऊंस लावतात कसा हें आम्हांला सांगा." बाप म्हणाला "ज्या जमिनींत ऊंस लावावयाचा असेल, ती चांगली नांगरून तिचे लहान लहान वाफे करितात, व त्यांत पाणी सोडतात. जमीन नीट भिजल्यावर जून उंसाचे तुकडे आणून आडवे लावितात. हे पहा उंसाचे डोळे. तुकडे लावतांना डोळे बाजूला ठेवितात. ह्या प्रत्येक डोळ्यापासून एकएक कोंब फुटतो; व त्याचा एक एक ऊंस तयार होतो. उंसाला वरचेवर पाणी द्यावें लागतें. कोल्हे व रानडुकरें उंसाची फार नासाडी करितात; म्हणून शेताची फार जपून राखण करावी लागते." मुलगा म्हणाला "खाण्याशिवाय उंसाचा आणखी काय उपयोग

आहे ?" बाप म्हणाला "उंसाचा रस काढून तो कढईंत आटवितात. आटवून घट्ट झाला म्हणजे त्याचा गूळ होतो. उंसाच्या रसापासून साखर सुद्धां करितात. परंतु साखर करणें फार खटपटीचें काम आहे."

---

धडा १८

## हत्तीचें शहाणपण

एका जंगलांत एक रानटी हत्तींचा कळप होता. ते हत्ती रात्रीं भोंवतालच्या शेतांत जाऊन नासधूस करीत. त्यांच्यापैकीं एक हत्ती एकदां आजारी पडला. तेव्हां त्याचा सोबती शेजारच्या एका शेतांत गेला; व त्यानें तेथल्या एका माणसास सोंडेनें उचलून आपल्या पाठीवर घेतलें. हें पाहातांच तो मनुष्य भयानें बेशुद्ध झाला; परंतु हत्तीनें संभाळून त्याला जंगलांत नेलें.

थोड्या वेळानें तो मनुष्य सावध झाला. तेव्हां आजारी हत्ती लंगडत लंगडत त्याचे जवळ

गेला, व त्यानें आपला दुखरा पाय वर उचलून त्याचे हातांत दिला. तेव्हां त्याला दिसलें कीं, पायांत वेळूची काटकी घुसली आहे. त्या माणसानें हळूच ती काटकी काढली, व सुजलेला भाग दाबला, तेव्हां त्यांतून पुष्कळ पू व नासलेलें रक्त बाहेर आलें. मग त्यानें ती जखम चांगली धुतली, व तीवर स्वच्छ काळी माती कालवून थापून दिली. इतकें झाल्यावर जखमी हत्ती सोंडेनें त्याला सलाम करून निघून गेला; व दुसऱ्या हत्तीनें त्याला परत शेतांत पोहोंचविलें.

ही हकीकत ऐकून लोकांना फार आश्चर्य वाटलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं पाहातात तों, इतर लोकांच्या शेतांतलें सर्व धान्य कोणीतरी त्या शेतांत आणून टाकलेलें दिसलें. तेव्हां ते सर्व लोक त्या शेतकऱ्याशीं भांडूं लागले. मग त्या गांवच्या पाटलानें त्या धान्याचे पैसे स्वतः त्या लोकांना दिले; व हत्तींनीं त्या शेतकऱ्यास बक्षीस दिलेलें धान्य त्याचेकडे ठेविलें.

धडा १९

# सोन्याची कुऱ्हाड



एक मनुष्य नदीच्या कांठचें एक झाड तोडीत होता. त्याची कुऱ्हाड हातांतून निसटून डोहांत पडली. तेव्हां तो नदीच्या कांठीं बसून रडूं लागला. त्याचें रडणें ऐकून एक देवदूत तेथें आला, व म्हणाला "भल्या माणसा तूं कां रडतोस ?" तो मनुष्य म्हणाला "माझी कुऱ्हाड

डोहांत पडली म्हणून मी रडतों." हें ऐकून देवदूतानें डोहांत बुडी मारून एक सोन्याची कुऱ्हाड वर आणली; व तो म्हणाला "हीच तुझी कुऱ्हाड आहे काय?" तो मनुष्य म्हणाला "ही कुऱ्हाड माझी नव्हे." देवदूतानें पुन्हा बुडी मारून एक रुप्याची कुऱ्हाड काढली, व तो त्याला म्हणाला "ही तरी तुझी आहे काय?" परंतु तो मनुष्य म्हणाला "हीसुद्धां माझी नव्हे." देवदूतानें पुन्हा बुडी मारून त्याची कुऱ्हाड वर आणली, आणि त्याला दाखविली. तेव्हां तो मनुष्य म्हणाला "हीच माझी कुऱ्हाड आहे." देवदूतानें त्याची कुऱ्हाड त्याला दिली; व त्याचे खरेपणाबद्दल दुसऱ्या दोन्ही कुऱ्हाडी त्याला बक्षीस दिल्या. तो मनुष्य देवदूताला नमस्कार करून घरीं गेला, व देवदूत गुप्त झाला.

गांवांत ही गोष्ट कळतांच एक मनुष्य मुद्दाम त्या नदीवर गेला. व स्वतःच कुऱ्हाड डोहांत टाकून मोठ्यानें रडत बसला. पहिल्या प्रमाणेंच देवदूत तेथें आला; व विचारूं लागला "भल्या

माणसा, तूं कां रडतोस?" तो म्हणाला "माझी कुऱ्हाड डोहांत पडली, म्हणून मी रडतों." देवदूतानें पाण्यांत बुडी मारून एक सोन्याची कुऱ्हाड वर आणली, व त्याला विचारिलें "हीच तुझी कुऱ्हाड काय?" तो म्हणाला "होय, हीच माझी कुऱ्हाड." ही त्याची लबाडी पाहून देवदूत ती सोन्याची कुऱ्हाड घेऊन एकदम नाहींसा झाला. ह्याप्रमाणें त्या लबाड माणसानें खोटें बोलून स्वतःची कुऱ्हाड मात्र गमाविली.

धडा २०

## इंद्रधनुष्य

( विठूचा गजर हरिनामाचा ह्या चालीवर )

ए ताई, ताई धांवत येई बघ ही आकाशीं ॥
आकाशीं, गंमत झाली कैशी ढग हा करी सडा ॥
करी सडा, पाडुनि पाउस थोडा, त्यावर रांगोळी ॥
रांगोळी, बघ ही नामी खुलली, जणु का चंद्राची ॥
चंद्राची, कोरच दिसते साची, अहाहा किति रंग ॥

किति रंग, तिजमध्यें भरले सांग, बघ हे चोहिंकडे ॥
चोहिंकडे, तेज फांकलें सगळें, वाटे पुष्पांची ॥
पुष्पांची, माळ गुंफिली साची, पाहुनि ते दोघे ॥
ते दोघे, नाचति बहु आनंदें, गाती स्वच्छंदें ॥

---

घडा २१

## हयगयीचा परिणाम

एका पाटलाच्या घरीं बरींच जनावरें होतीं. त्यांना तो आवारांतील गोठ्यांत बांधीत असे. आवाराला एक फाटक होतें; परंतु त्याला कडी नव्हती. त्यामुळें फाटक नेहमीं उघडें राही. फाटकाला कडी लावण्याबद्दल, त्याचे बायकोनें त्याला पुष्कळ सांगितलें; परंतु त्यानें तिच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं.

एके दिवशीं संध्याकाळीं त्या पाटलाचा एक गडी, गोठ्यांत गुरें वांसरें बांधीत होता. इतक्यांत एक वांसरूं त्याचे हातून एकदम सुटलें, व फाटकांतून बाहेर निघून उड्या मारीत शेतांत गेलें. तो नोकर गुरें तशींच सोडून वासरामागें

धावला; परंतु तें त्याचे हातीं सांपडेना. तेव्हां "वासरूं पळालें, वासरूं पळालें" असें तो मोठ्यानें ओरडला. त्या वेळीं पाटलाची बायको चुली जवळ भाकऱ्या भाजीत होती. गड्याचें ओरडणें ऐकून, तीही त्याचे मागें धावत गेली. पाटीलही आपलें काम टाकून धांवत धांवत तिकडे गेला.

धावतां धावतां शेतांतील खळग्यांत पाय जाऊन, तो चाकर पडला; व त्याचा पाय मोडला तेव्हां पळालेलें वासरूं तसेंच टाकून पाटील, व त्याची बायको ह्या दोघांनीं त्या गड्याला उचलून घरांत नेलें. इकडे चुलीवरच्या भाकरी जळून गेल्या, व तापत असलेलें दूध मांजरानें उपडें केलें. गोठ्यांत गुरें तशींच मोकळीं होतीं. त्यांत एक मारका बैल होता. त्यानें दुसऱ्या गुरांना व वांसरांना शिंगांनीं भोसकलें. त्यामुळें कांहीं गुरें बाहेर येऊन त्यांनीं आवारांतील फुलझाडें खाऊन टाकलीं. वेळींच फाटकाला कडी लाविली असती, तर इतकें नुकसान झालें नसतें.

धडा २२

# बळी तो कान पिळी



एकदां एक कोंकरूं एका ओढ्यावर पाणी पीत होतें; इतक्यांत एक लांडगा पाणी पिण्यासाठीं तेथें आला. त्याला पाहून कोंकरूं दूर खालच्या बाजूला जाऊन पाणी पिऊं लागलें. लांडग्यानें कोंकराला पाहिलें व त्याला मारून खावें, असें त्यास वाटलें. तेव्हां तो त्याला म्हणाला "कायरे, मी पाणी पीत आहें, हें तुला दिसत

नाहीं काय ? तूं पाणी गढूळ कां करीत आहेस ?" कोंकरूं म्हणालें "लांडगेदादा, असें कसें म्हणतोस ? पाणी तुझ्याकडून माझेकडे वहात येत आहे." हें ऐकून लांडगा पुन्हा म्हणाला "सहा महिन्यांपूर्वीं तूं मला शिव्या दिल्यास असें माझ्या कानीं आलें आहे." कोंकरूं म्हणालें "दादा, तुला कोणीं तरी खोटी गोष्ट सांगितली आहे. मला जन्मून अजून पुरते तीन महिनेसुद्धां झाले नाहींत. तेव्हां सहा महिन्यांपूर्वीं मीं तुला शिव्या दिल्या, ही गोष्ट होईल तरी कशी ?" लांडग्याला ह्यावर कांहींच बोलतां येईना, त्यामुळें तो फार चिडला; आणि रागानें पाय आपटीत, व डोळे वटारून त्याचे जवळ गेला; व ओरडून त्याला म्हणाला " गप बैस, उगाच बडबड करूं नकोस. तूं शिव्या दिल्या नसल्यास तर तुझ्या बापानें दिल्या असतील." असें बोलून त्यानें त्या कोंकरावर झडप घातली, व त्याचा प्राण घेतला.

धडा २३

# बेल व तुळस

एका बागेंत बेलाचें, व तुळशीचें अशीं दोन झाडें जवळ जवळ होतीं. एके दिवशीं जोराचा वारा सुटला. तेव्हां तुळशीचें झाड वांकलें; पण बेल ताठच राहिला. ह्या वेळीं बेलाला वाटलें कीं, आपण तुळशीपेक्षां किती तरी बळकट आहों. ह्यामुळें तो तुळशी जवळ रोजच्या प्रमाणें बोलला नाहीं. तेव्हां तुळस म्हणाली " दादा, कांरे बोलत नाहींस ? " बेलानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हां तुळस पुनः म्हणाली " दादा, कांरे रागावलास ? " तेव्हां बेल म्हणाला " गप्प बैस, मी तुझ्यापेक्षां किती बळकट आहें. मला तुझ्याबरोबर बोलण्यास लाज वाटते. शिवाय माझ्या लांकडाचा लोकांना चंदनाप्रमाणें उपयोग होतो. "

तुळस म्हणाली, " माझाही चंदनाप्रमाणें उपयोग होतो. शिवाय माझ्या लांकडाचे मणी करून लोक त्यांच्या माळा गळ्यांत घालतात."

बेलः—माझ्या फुलाचा वास किती तरी चांगला. मधमाशा माझ्या फुलांवर एकसारख्या उड्या टाकितात.

तुळसः—माझ्या मंजरीचा घमघमाट काय कमी आहे ? डांस तर मला भिऊन दूर पळून जातात.

बेलः—माझें पान किती तरी मोठें, आणि तुझें पाहा !

तुळसः—बाई, बाई, आतां तर तुझ्यापुढें शर्थ झाली. अरे पान नुसतें मोठें असून काय उपयोग ? त्यांत थोडा तरी ओलावा असतो का ? आणि रुची तर इतकी चांगली कीं गुरेंसुद्धां तें खात नाहींत.

बेलः—पण माझें फळ मोठें आहे; लोक त्यांतील मगज आवडीनें खातात व त्याचा औषधासारखाही उपयोग होतो.

तुळसः—माझ्या पानांचाही औषधासारखा उपयोग होतो. माझ्या पानांच्या

काळ्यानें, ताप, पडसें, खोकला हे विकार बरे होतात. शरीराला जखम झाली, व त्या जखमेवर माझीं पानें चोळून बांधलीं म्हणजे रक्त वाहाणें बंद होतें. हें नाहीं का तुला ठाऊक ?

बेलः—खरेंच ताई, आपण दोघेंही सारखींच आहों, मी आजपासून तुझ्याशीं नीट बोलेन.

---

धडा २४

## पांढरीं अक्षरें

मुलांनो, तुह्मी पांढऱ्या कागदावर निरनिराळ्या रंगाच्या शाईनें लिहिलेलीं अक्षरें पाहिलीं असतील; पण काळ्या कागदावर पांढरीं अक्षरें तुम्हीं कधीं पाहिलीं आहेत काय ? अशीं अक्षरें लिहिण्याची युक्ती अगदीं सोपी आहे, ती मी तुम्हांला आतां सांगतों.

पहिल्यानें पांढऱ्या कागदावर साखरेच्या किंवा गुळाच्या पाण्यानें लिहावें, आणि तो कागद

उन्हांत वाळवावा. चांगला वाळला, म्हणजे त्या कागदावर कोरडें काजळ घांसावें. कागद चांगला काळा कुळकुळीत झाला म्हणजे, तो एखाद्या फळीवर टांचण्यांनीं लावून, त्यावर जोरानें पाणी शिंपडावें. असें केलें म्हणजे लिहिलेलीं अक्षरें अगदीं पांढरीं स्वच्छ दिसूं लागतात, व कागदावर काजळ फांसल्यामुळें तो काळा होतो.

ही गोष्ट कशी होते, तें मी तुम्हांला सांगतों. साखरेवर किंवा गुळावर पाणी पडतांच तो पदार्थ त्यांत विरघळतो. म्हणून जेथें अक्षरें लिहिलीं असतील तेवढ्या भागावरचें काजळ धुवून निघून जातें, व तो भाग पांढरा दिसूं लागतो. इतर भागावरचें काजळ लौकर धुवून जात नाहीं, म्हणून बाकीचा कागद काळाच राहातो. काळ्या कागदावर पांढरीं अक्षरें लिहिण्याचीं हीच युक्ती. सुटीच्या दिवशीं तुम्ही करून पहा.

---

घडा २५

# माझें झाड

जा जा लांकुडतोड्या, करिशी तूं काय कर्म
बापा हें ॥
तोडूं नको नको तें आवडतें झाड आमचें
आहे ॥ १ ॥
फांदी काय तयाचें पानहि तोडावया पुढें हात ॥
ज्याचा सरेल त्याचा ह्या दंडानें करीन मी
घात ॥ २ ॥
लावियलें हें माझ्या आजानें झाड आमचे दारीं॥
वृद्ध असूनहि होता ह्याची तो घेत काळजी
भारी ॥ ३ ॥
आहे जुनाट तरु हा खोल किती हीं पहा मुळें
गेलीं ॥
असतील मार्ग न मिळे म्हणुनि पुढें शेषमस्तकीं
ठेलीं ॥ ४ ॥
वर जों शाखा चढती वाढत तों जाय आमुचें
वित्त ॥

ऐसें वाटुनि माझें आनंदानें उचंबळे चित्त ॥ ५ ॥
येथें गड्यांसवें मी बाळपणीं मारिल्या अनेक
उड्या ॥
घालित होत्या माझ्या बहिणी ह्याच्या सभोंवतीं
फुगड्या ॥ ६ ॥
झाड न हें आंब्याचें ही माझी होय संपदा सारी ॥
इच्छा हीच असे हें राहो आहे तसेंच ह्या
दारीं ॥ ७ ॥
जा शीघ्र दूर, जा तूं आहे बा लागली तुझी दृष्टी ॥
म्हणुनी झाड पहा तें झालें आहे किती तरी
कष्टी ॥ ८ ॥
येवोत वादळें बहु वर्षो घन घोर मुसळ धारांनीं ॥
झाड असेंच उभें हें माझें राहील ह्या तरी रानीं ॥९॥

---

धडा २६

## थट्टेनें मेला पण अकलेनें वांचला

एका राजाचे पदरीं एक खुषमस्कऱ्या होता. तो थट्टा करून व गमतीच्या गोष्टी सांगून राजाची करमणूक करीत असे. एकदां त्यानें

राजाची फारच थट्टा केली. म्हणून राजाला फार राग आला, व त्याला मारून टाका, असा राजानें आपल्या शिपायांस हुकूम केला.

त्या खुषमस्कऱ्यानें राजाच्या पुष्कळ विनवण्या करून क्षमा मागितली. पण राजा म्हणाला "मी तुला मुळींच क्षमा करणार नाहीं; तूं मरावयास तयार हो". तेव्हां तो म्हणाला "सरकार ह्या दासावर थोडी तरी दया करा." तेव्हां राजा म्हणाला "तुझें मरण तर चुकत नाहींच; पण तूं इतके दिवस माझी चांगली सेवा केलीस, म्हणून तुला कसें मरावेंसें वाटतें तें सांग, म्हणजे त्याप्रमाणें तजवीज करूं". तें ऐकून खुषमस्कऱ्या म्हणाला "मला म्हातारें होऊन मरावें असें वाटतें. आपण नेहमीं बोलल्याप्रमाणेंच वागतां; तेव्हां ही माझी इच्छा आपण पुरवाल अशी मला पूर्ण आशा आहे."

हें उत्तर ऐकून राजाला हसूं लोटलें, आणि त्यानें त्याच्या अपराधाची क्षमा केली.

धडा २७

# सिंह आणि उंदीर



एकदां एक सिंह आपल्या गुहेंत स्वस्थ निजला होता. त्या गुहेंत एक उंदराचें बीळ होतें. त्यांतून एक उंदीर बाहेर आला, व इकडे तिकडे उड्या मारूं लागला. सिंह निजला आहे असें पाहून

त्यानें सिंहाच्या आंगावर सुद्धां उड्या मारल्या. त्यामुळें तो सिंह जागा झाला, व त्यानें त्या उंदरास आपल्या पंजांत पकडलें. तो त्याला चिरडून टाकणार इतक्यांत उंदीर रडत रडत म्हणाला, "महाराज माझ्या हातून चूक झाली खरी, परंतु ह्या वेळीं आपण मला क्षमा करा, व मारूं नका. मी आपले उपकार जन्मभर विसरणार नाहीं; व केव्हां तरी मी आपल्या उपयोगीं पडेन."

हें बोलणें ऐकून सिंहाला तर हंसूच आलें, व तो मनांत म्हणाला, "ह्या एवढ्याशा प्राण्याचा मला काय उपयोग होणार"? परंतु त्याला दया येऊन त्यानें त्याला सोडलें.

पुढें एके दिवशीं तो सिंह रानांत फिरत असतां, एका जाळ्यांत सांपडला, व सुटण्यासाठीं धडपड करूं लागला. सुटतां येईना तेव्हां घाबरून मोठ्यानें ओरडूं लागला. त्याचें ओरडणें ऐकून उंदीर धावत तेथें आला, व म्हणाला "महाराज, घाबरूं नका. मी जाळें तोडून तुम्हांस

मदत करितों." असें बोलून थोडयाच वेळांत जाळें तोडून त्यानें त्या सिंहास मोकळें केलें.

तेव्हां सिंह म्हणाला, "शाबास, तूं माझ्या खरोखर उपयोगीं पडलास. तुझ्यासारख्या लहान प्राण्याचे हातून मला मदत होईल, असें मला मुळींच वाटत नव्हतें.

---

धडा २८

## पूर आलेली नदी

खळ खळ खळ ऐसा शब्द होतो जलाचा ॥
दुरुनि कळत नाहीं अब्धिचा कीं नदीचा ॥
मधुनि उठति लाटा पर्वताचे समान ॥
भरुनि जल हि वाहे दों-थडींनें भरून ॥ १ ॥
ओहोळ पूर्वीं अगदीं लहान ॥
जन्मास येई दगडांमधून ॥
हेतू धरी सिंधुस भेटण्यासी ॥
आनंदुनी कंठितसे पथासी ॥ २ ॥
ओढे नाले अल्पसे जे मिळाले ॥
त्यांना संगें घेउनी वाट चाले ॥

वर्षाकाळीं साह्य पर्जन्य होई ॥
पूरें त्यातें तें नदीरूप येई ॥ ३ ॥

सिंधू विशाल नलगे कधिं अंत त्याला ॥
येती नद्या बहुत त्यांत मिळावयाला ॥
सोडी न शांतपण तो सहसा फुगोनी ॥
शीला त्यजी कुमति अल्पगुणें चढोनि ॥४॥

मिळो किती ही धन मानवाला ॥
जरी करी साह्यहि दुःखिताला ॥
लपे न त्याचा पहिला स्वभाव ॥
धरीं मुला यास्तव थोर भाव ॥ ५ ॥

---

धडा २९

## केळीचें झाड

एकदां वामन जेवावयासाठीं केळीचें पान तोडण्यास बागेंत गेला. एक पान कापतांच पानाच्या दांड्यांतून रसाची धार वाहूं लागली. त्याला वाटलें, कीं हें केळीचें रक्तच आहे. दोन चार दिवसांपूर्वीं लेखणी ताशीत असता, त्याचें

बोट कापलें होतें; त्याची त्याला ह्या वेळीं आठवण झाली. बोट कापल्यानें आपल्याला जसें दुःख होतें, तसेंच केळीलाही होत असेल असें वाटून त्याचे डोळे पाण्यानें भरून आले.

तेव्हां केळ बोलली " मुला, रडूं नकोस; तूं जेवावयाकरितां पान कापलेंस, त्याचें मला फारसें दुःख वाटत नाहीं; पण द्वाड मुलें उगीच्या उगीच माझ्या पानाच्या चिंधड्या उडवितात, त्याचें मला फार वाईट वाटतें.

माझ्या पानाएवढीं मोठीं पानें कोणत्या तरी झाडाचीं आहेत काय? मला पाणी फार आवडतें. पानावर जेवढा पाऊस पडेल तेवढा गोळा करून तो दांड्याच्या नळींतून मुळांकडे मी पाठवून देतें. तरी माझी तहान भागत नाहीं. मला लोकांनीं पाणी पाजलें नाहीं, तर मी मरेन. माझें खोड इतर झाडांच्या खोडासारखें नाहीं, त्यांत एकावर एक पुष्कळ पापोद्रे असतात.

माझ्या बुडाभोंवतीं जे कोंब असतात, तींच माझीं मुलें. म्हातारपणीं मला त्यांना

पोसवत नाहीं; तुझ्यासारखीं दयाळू माणसें त्यांना दुसरीकडे नेऊन लावितात; म्हणूनच तीं वांचतात, ह्याबद्दल मी तुमची फार आभारी आहें. पण आतां तूं लौकर घरीं जा, नाहीं तर तुझे बाबा तुला रागावतील. ”

---

धडा ३०

## विनोदाचे बोल खरे झाले

शिवाजी महाराजांच्या बापाचें नांव शहाजी, व आईचें नांव जिजाबाई असें होतें. त्यांच्या लग्नाची हकीकत मोठ्या मौजेची आहे. ती अशीः—

अहमदनगरचे बादशहाचे दरबारांत जिजाबाईचा बाप जाधवराव हा मोठा श्रीमंत सरदार होता; व शहाजीचा बाप मालोजी हा त्याचे पदरीं लहान सरदार होता. शहाजी बापाबरोबर कधीं कधीं जाधवरावांकडे जात असे.

एकदां रंगपंचमीच्या दिवशीं जाधवरावांनीं आपल्या मित्रांना व सरदारांना पानसुपारीस

बोलाविलें-मालोजी बरोबर त्याचा मुलगा शहाजी हाही तेथें गेला. शहाजी फार देखणा होता, म्हणून तो सर्वांना आवडे. जाधवरावांनीं त्याला आपल्याजवळ बसविलें. त्यांचेजवळ त्यांची मुलगी जिजाबाईही बसली होती. जाधवराव तिला म्हणाले "जिजाऊ, तुला हा नवरा हवा का ? व लोकांना ह्मणाले "काय हो हा जोडा नामी शोभतो नाहीं?" इतक्यांत त्या मुलांनीं एकमेकांच्या आंगावर गुलाल टाकला. तें पाहून सर्व मंडळीस मोठी मौज वाटली. तेव्हां मालोजी उठून म्हणाला, "सरदार हो ऐका, आजपासून जिजाबाइ माझी सून झाली." दुसऱ्या दिवशीं जाधवरावांनीं मालोजीला मेजवानीला बोलाविलें. तेव्हां त्यानें निरोप पाठविला कीं "जिजाबाइ माझ्या शहाजीला देण्याचें कबूल कराल, तरच मी मेजवानीला येईन." जाधवरावांना वाटलें, मालोजी आपल्या हाताखालचा सरदार. त्याचे घरीं मुलगी कशी द्यावी ? म्हणून त्यानें उलट कांहींच उत्तर पाठविलें नाहीं. तेव्हां मालोजीला फार राग आला.

मालोजी फार बाणेदार मनुष्य होता. त्यानें लढाया जिंकून मोठी कीर्ती मिळविली. त्यामुळें बादशहा खूष होऊन, त्यानें त्याला राजे अशी पदवी दिली, व जहागीर दिली. तेव्हां मालोजीनें पुन्हां जिजाबाईसाठीं मागणी घातली. आतां जाधवरावांच्यानें नाहीं म्हणवेना. तेव्हां त्यांनीं ती गोष्ट कबूल केली. नंतर थोड्याच दिवसांनीं शहाजी व जिजाबाई ह्यांचें लग्न मोठ्या थाटानें झालें.

---

धडा ३१

## स्नान

आपल्या शरिराला घाम येतो, घामानें भिजलेला कपडा वाळला, तरी त्याला घाण येते. ह्यावरून घामाबरोबर शरिरांतून घाण बाहेर पडते, हें उघड आहे. आपल्या कातडीला फार बारीक बारीक भोंकें असतात, त्यांतून हा घाम बाहेर येतो, हीं भोंकें जर बंद झालीं, तर

शरिरांतील घाण तशीच आंत राहील. ह्यासाठीं रोज स्नान करून हीं छिद्रं मोकळीं ठेविलीं पाहिजेत. जो मनुष्य रोज आंघोळ करीत नाहीं त्याचे आंगास घाण येते; व त्याला खरूज वगैरे रोग होतात.

सकाळींच स्नान करावें हें उत्तम. रात्रभर निजल्यानें मनुष्याला आळस आलेला असतो. तो स्नान केल्यानें नाहींसा होतो; व आंगांत तरतरी येते. उन्हाळ्याचे दिवसांत रात्रीं घाम फार येतो; म्हणून त्या दिवसांत तर सकाळींच स्नान करणें फार जरूर आहे.

थंड पाण्यानें स्नान करणें फारच चांगलें; पण ज्यांना हें सोसणार नाहीं, त्यांनीं गरम पाण्यानें स्नान करावें. नदींत किंवा तलावांत पोहोणें फार उत्तम. कारण त्यानें आंग स्वच्छ होऊन शिवाय मेहेनत होते. पोहोतांना उंचावरून उड्या मारूं नयेत, व फार वेळ पाण्यांत डुंबूं नये.

स्नान नेहमीं डोक्यावरून करावें. पुष्कळ मुलें स्नान खांद्यावरूनच करितात. पण अशानें

त्यांच्या डोक्यांत मळ सांचतो, व खवडे होतात.

स्नान करितांना खरखरीत रुमालानें आंग चांगलें चोळावें. कारण असें केल्याशिवाय कातडी स्वच्छ होणार नाहीं. पुष्कळ लोक स्नान करितांना पाण्याचे लोटे भराभर डोक्यावर ओततात. असें करण्यापासून कांहींच फायदा नाहीं. दोन, चार दिवसांनीं आंगाला, शिकेकाई, लिंबाचा रस किंवा साबण लाऊन स्नान करावें. असें केल्यानें शरिरावरचा मळ साफ निघून जातो.

स्नानानंतर ताबडतोब रुमालानें आंग पुसावें. आंग पुसावयाचा रुमाल अगदीं स्वच्छ असावा. घाणेरड्या रुमालानें आंग पुसलें, तर रुमालाचीच घाण आंगाला लागेल. पुष्कळ मुलें स्नानानंतर आंगपुसणें शोधण्यासाठीं, ओलेत्यानेंच हिंडत असतात. त्यामुळें त्यांस सरदी होते. ह्यासाठीं आंग पुसावयाचा रुमाल जवळ ठेऊन मग स्नानाला बसावें.

---

धडा ३२

# गुलाबाचें फूल



( फुलें वेलींचीं—ह्या चालीवर )

फूल गुलाबाचें । सुबक हें फूल गुलाबाचें ॥ ध्रु०॥
काटे असती सर्वांगावर ।
जणु सुमनाचें रक्षण यावर ।
लहानशी कळि दिसे मनोहर ।
फुलतां ती साचें । सुबक हें फूल गुलाबाचें ॥१॥

रंग गुलाबी मोहक ह्याचा ।
सुवास सुटतो घम घम ज्याचा ।
हा राजा जणु सर्व फुलांचा ।
सकळ वदति वाचे । सुबक हें फूल गुलाबाचें ॥२॥
गुलाब कळि गुलकंद मधुरतर ।
पित्त शमवि शरिरातें सुखकर ।
निघतें ह्याचें सुगंध अत्तर ।
कौतुक त्या प्रभुचें । सुबक हें फूल गुलाबाचें ॥३॥
चांगुलपण अवडे सकळांला ।
जणु देई हें बोध मुलांला ।
व्हा सद्गुणि द्या सुख देशाला ।
भूषण स्वकुलाचें । सुबक हें फूल गुलाबाचें ॥४॥

---

धडा ३२

## कुत्र्याची गोष्ट

हरी नांवाचा एक मुलगा एकदां शाळेंतून घरीं परत येत असतां त्याला रस्त्यांत एक कुत्रा दिसला. पुष्कळ दिवसांत खावयास न मिळाल्यामुळें तो अगदीं रोड दिसत होता; व धुळीनें

त्याचें अंग मळलें होतें. तो कुत्रा हरीचे मागून चालूं लागला. एखाद्या द्वाड मुलानें त्या कुत्र्याला दगड मारून दूर हांकून दिलें असतें. परंतु हरी दयाळु होता; म्हणून त्यानें त्या कुत्र्याला आपल्या मागून येऊं दिलें.

घरीं पोंचल्यावर बापाची परवानगी घेऊन हरीनें त्या कुत्र्याला मागचे आंगणांत नेऊन स्वच्छ धुतलें; व त्याला खावयासाठीं भाकरी दिली. दररोज सकाळीं व संध्याकाळीं हरी त्या कुत्र्याला दूधभाकरी, किंवा दूधभात खावयास देत असे; व दोन चार दिवसांनीं त्याला स्वच्छ धूत असे. आठपंधरा दिवसांत तो कुत्रा चांगला दिसूं लागला. हरीनें त्याचें मोत्या असें नांव ठेविलें.

मोत्याची व हरीची चांगली मैत्री जमली. हरी व त्याचा धाकटा भाऊ शाळेंत जाऊं लागले म्हणजे, मोत्या त्यांचे बरोबर त्यांना पोंचविण्या-साठीं शाळेंत जात असे. ते शाळेंत पोंचले म्हणजे घरीं येऊन, आवारांत राखण करीत

इकडे तिकडे हिंडत असे. तेथें पुष्कळ फुलझाडें लाविलेलीं होतीं. शेजारच्या लोकांच्या बकऱ्या येऊन तीं खात असत. परंतु मोत्या आल्या-पासून एकसुद्धां बकरी तेथें येईनाशी झाली.

शाळा सुटण्याचे वेळीं मोत्या मुलांना आण-ण्यासाठीं पुन्हा शाळेंत जात असे. तो जवळ असतांना कोणाही द्वाड मुलाची हरीला व त्याचे धाकट्या भावाला त्रास देण्याची छाती नव्हती.

रात्रीच्या वेळीं मोत्याचा घराभोंवतीं अगदीं खडा पहारा असे. कोणीही परका मनुष्य नुसता फाटकापाशीं आला, तरीसुद्धां तो मोठ्यानें भुंकून घरांतील माणसांस सावध करी. अशा रीतीनें तो कुत्रा पुढें पुष्कळ दिवस हरीचे घरीं राहिला.

---

धडा ३४

## एका राजाचा थोरपणा

एकदां एक राजा शिकारीसाठीं रानांत गेला. त्याच्याबरोबर त्याचा प्रधान, व दहावीस

शिपाई होते. राजाचा घोडा फार चांगला असल्यामुळें तो अरण्यांत थोडा पुढें गेला. प्रधान व शिपाई मागून येत होते. इतक्यांत हातांत बंदुका घेतलेले दोन मनुष्य त्या राजाला दिसले. राजानें त्यांना विचारिलें " कोणरे तुह्मी ?" त्या मनुष्यांनीं बंदुका फेकून देऊन राजापुढें साष्टांग नमस्कार घातला, व उठून हात जोडून ते म्हणाले "महाराज, आम्ही चोर आहों. महाराजांना मारून आंगावरचे दागिने काढून घ्यावे, असा आमचा बेत होता." राजा म्हणाला "मग तुम्हीं मला कां मारिलें नाहीं ?" ते म्हणाले " महाराजांना पाहून आमचा धीर खचला; व आमचे हात कांपूं लागले." राजा म्हणाला " तुम्ही असलें वाईट काम करावयास कसे तयार झालां ?" ते म्हणाले " महाराज, काय करावें ? घरीं मुलें उपाशीं मरत आहेत, कामधंदा मिळत नाहीं; म्हणून नाइलाजानें आम्ही हें काम करावयास तयार झालों. आम्हाला आतां फार वाईट वाटत आहे. अपराध माफ करा." राजा म्हणाला

“ बरें तर मी तुम्हांला चाकरीला ठेवितों, पुन्हा असलें वाईट काम करूं नका ” इतक्यांत प्रधान व शिपाई तेथें आले. राजा प्रधानाला म्हणाला “ नगरांत परत गेल्यावर ह्या दोन मनुष्यांना नोकरीवर ठेवा. सध्या हे आपल्या शिपायांबरोबर असूंद्या, नंतर सर्वजण शिकारीसाठीं पुढें गेले.

---

धडा ३५

## कोल्ह्याचा धूर्तपणा

एक कोल्हा समुद्राचे कांठीं राहात असे. एके दिवशीं कांहीं खावयास न मिळाल्यामुळें, त्याला फार भूक लागली. इतक्यांत एक लांडगा तेथें आला. त्यानें समुद्र कधींच पाहिला नव्हता. ती वेळ भरतीची असल्यामुळें लाटांचा मोठा आवाज होत होता. तो ऐकून लांडग्यानें कोल्ह्यास विचारिलें “हा आवाज कशाचा ?” कोल्हा म्हणाला “ माझ्या समुद्राचा.” लांडगा म्हणाला “ समुद्र म्हणजे काय ?” कोल्हा म्हणाला “ चल तुला दाखवितों.” असें म्हणून कोल्ह्यानें त्यास

समुद्रावर नेलें. लाटा पुढें येत होत्या, व मागें जात होत्या. आपण त्यांच्याशीं बोलतों आहों, असें दाखविण्याकरितां कोल्हा तोंडानें कांहीं पुटपुटूं लागला. तें पाहून लाडगा म्हणाला " हा



तुझें ऐकतो काय ?" कोल्हा म्हणाला " अगदीं माझ्या हुकुमांत आहे; पहा " असें म्हणून तो समुद्राकडे तोंड करून म्हणाला " समुद्रा पुढें ये " त्या वेळीं खरोखरच एक लाट पुढें आली.

नंतर कोल्हा म्हणाला " जा, मागें जा." त्याबरोबर पुढें आलेलें पाणी मागें गेलें. हें पाहून लाडगा म्हणाला " मी एक वेळ पाण्यांत जाऊं काय ? " कोल्हा म्हणाला, " जा, खुशाल जा, मी तुला बुडूं देणार नाहीं. "

लांडगा मोठा धीर करून बराच पुढें गेला. इतक्यांत एक मोठी लाट येऊन त्याच्या नाका तोंडांत पाणी गेलें, व तो बुडून मेला. थोड्याच वेळानें, त्याचें प्रेत लाटेबरोबर कांठावर आलें. कोल्ह्यानें तें ओढून त्यावर चांगला ताव मारिला.

---

घडा ३६

## गोकुळांतील लोकांचें दुःख

( मथुरेचा राजा कंस ह्यानें कृष्ण व बलराम ह्या दोघांला बोलावण्यासाठीं अक्रुरास गोकुळांत पाठविलें. त्यानें कंसाचा निरोप नंदाला सांगितला. राजाचाच निरोप होता, म्हणून नंदानें मोठ्या दुःखानें त्याना घेऊन जाण्यास परवानगी दिली. ही बातमी गोकुळांतल्या लोकांना समजली

तेव्हां कृष्ण व बलराम जाणार म्हणून सर्वांना फार दुःख झालें. त्या दुःखाचें वर्णन पुढील कवितांत केलें आहे. )

प्रातःकाळीं मात झाली गोकुळांत ॥
जातो वासुदेव मथुरेसीं ॥ १ ॥

गौळिणींचा मेळा मिळाला सकळ ॥
पिटीती कपाळ आपुले हातें ॥ २ ॥

एकी त्या घालीती केसांमध्यें माती ॥
एकी त्या लोळती भूमीवरी ॥ ३ ॥

आम्हां सोडूनीयां तूं रे कैसा जासी ॥
तूजवीण पिशीं आम्ही सर्व ॥ ४ ॥

कोण्ही रथापूढें जावोनीयां पडती ॥
आक्रोशें रडती सकळीक ॥ ५ ॥

अक्रूरा आम्ही सर्व पसरीतों
नेऊं नको श्रीधर मथूरेसीं ॥ ६ ॥

नामा म्हणे शोक न वर्णवे आतां ॥
झाला तो हांकीता रथ त्वरें ॥ ७ ॥

---

धडा ३७

# मनचे मांडे



एक गवळण डोक्यावर दुधाची चरवी घेऊन दोन्ही हात सोडून रस्त्यानें चालली होती. तिच्या मनात असे विचार आले " अलीकडे दुधाला चांगला दर येतो. मी दूध विकून पैसे मिळवीन, व एक स्वतःची म्हैस विकत घेईन. तिचें दूध विकून आणखी पुष्कळ पैसा मिळवीन;

व मग दुसरी म्हैस विकत घेईन. ह्याप्रमाणें कांहीं दिवसांनीं दोहोंच्या चार, चारांच्या आठ ह्याप्रमाणें माझ्याजवळ पुष्कळ म्हशी होतील. मग दूध हलवायाला न विकतां, मी स्वतःच दूध, दही, तूप, खवा वगैरे जिन्नस विकण्याचें दुकान घालीन. अशा रीतीनें मला पुष्कळ नफा होऊन मी श्रीमंत होईन.

मग मी माझ्या मुलाकरितां एका श्रीमंत गवळ्याचे मुलीला मागणी घालीन. लग्न मोठ्या थाटानें करीन, व लग्नांत माझा मोठा बडेजाव होईल. सून घरीं आली म्हणजे, तिला मी अध्यां वचनांत ठेवीन.

माझी विहीण मला दिवाळसणाकरितां बोलावण्यास येईल आणि हात जोडून माझ्या पुढें उभी राहील. तेव्हा मी तिजकडे न पाहतां अशी झटक्यानें तोंड फिरवीन. " असें तिच्या मनात आलें, तेव्हां, तिनें झटक्यानें मान फिरविली. चरवी नुसती डोक्यावर होती, ती खालीं पडली, आणि सगळें दूध सांडून गेलें. चरवींतलें

दूध विकून जे पैसे आले असते, त्या पैशांवर तिचे सगळे बेत होते. तें दूधच सांडल्यामुळें, तिला फार वाईट वाटलें, व ती रडत तेथेंच बसली. तिच्या मनांतले सगळे बेत मनांतच राहिले.

---

घडा ३८

## प्रधानाचें चातुर्य

पूर्वीं चंद्रपूर शहरांत एक श्रीमंत सावकार रहात असे. त्याजपाशीं, हत्ती, घोडे, पालख्या, वगैरे पुष्कळ संपत्ती होती. त्याला तीन मुलगे होते. सावकारानें मरताना लिहून ठेविलें कीं आपल्या धाकट्या मुलास दौलतीचा अर्धा भाग मिळावा; मधल्या मुलास तिसरा हिस्सा, व वडील मुलास नववा हिस्सा मिळावा. सावकार मेल्यावर त्यानें ठरविल्याप्रमाणें, त्याच्या संपत्तीची वांटणी झाली. पण सतरा हत्ती होते, ते त्याप्रमाणें वांटतां येईनात. त्यामुळें मुलांमध्यें तंटा सुरू झाला. शेवटीं त्या मुलांनीं राजाकडे

फिर्याद केली. परंतु राजाला सुद्धां वाटणी कशी करावी हें सुचेना. तेव्हा त्यानें आपल्या प्रधानास वांटणी करण्यास सांगितलें.

प्रधान फार चतुर होता. भांडणाचें कारण काय, हें त्याचे तेव्हांच ध्यानांत आलें. मनांत कांहीं युक्ती योजून तो त्या तिघांना म्हणाला "तुम्हांला तुमचे वांट्यापेक्षां थोडें अधिक मिळाल्यास तुमची कांहीं हरकत नाहींना?" मुलगे म्हणाले " महाराज, असें झाल्यास आम्हांला आनंदच होईल." प्रधानानें त्यांचे सतरा हत्ती आणविले, व कचेरीच्या समोर आंगणांत रांगेनें उभे केले, व आपला स्वतःचा हत्ती, त्याच रांगेंत शेवटीं उभा केला. नंतर तो म्हणाला, " हे सगळे तुमचेच हत्ती आहेत, असें क्षणभर समजा. " नंतर तो धाकट्या मुलाला म्हणाला "तुला निम्मे हत्ती मिळावयाचे. घे आपले नऊ हत्ती, व बाजूला हो." मधल्या मुलाला म्हणाला, "तुझा तिसरा हिस्सा; घे आपले सहा हत्ती." नंतर वडील मुलाला म्हणाला, " तुझा नववा

हिस्सा; घे आपले दोन हत्ती." शेवटीं त्याचा हत्ती तेवढा शिल्लक राहिला. तेव्हा तो म्हणाला, "हा तर माझाच आहे, तो मी आपला घेतों." ही वांटणी त्या तीन्ही मुलांना पसंत पडली; व प्रधानाचें चातुर्य पाहून राजाही खूष झाला.

---

धडा ३९

## मोकळेपणाचें सुख

एका लांडग्यास कांहीं दिवस पोटभर खावयास न मिळाल्यामुळें तो अगदीं रोड झाला. एके दिवशीं तो एका घरावरून चालला असता त्यास तेथें एक लठ्ठ कुत्रा दिसला. लांडगा त्याचे जवळ जाऊन उभा राहिला. तेव्हा कुत्रा त्याला म्हणाला " काय लांडगे दादा, तूं आज इकडे गांवांत कसा आलास, व असा रोड का दिसतोस ? "

लांडगाः—काय करूं भाऊ, आज पांच चार दिवसांत मला पोटभर खावयास मिळालें नाहीं.



कुत्राः—अरेरे, फार वाईट गोष्ट झाली. मला बघ कसें दररोज दोन वेळ पोटभर खावयास मिळतें. माझा धनी फार चांगला आहे.

लांडगाः—तुझा धनी तुला फुकट खावयास घालतो काय ?

कुत्राः—फुकट कसा घालील? मी त्याचे घराची राखण करितों. चोरांना मुळींच येऊं

देत नाहीं; म्हणून तो मला खावयास घालतो. तूं अशीच चाकरी करशील तर तुलाही खावयास मिळेल.

लांडगाः—त्यांत काय आहे, मी असली चाकरी सहज करीन पण कायरे भाऊ, हें तुझ्या गळ्यांत काय आहे ?

कुत्राः—सांखळदंड अडकवण्याचा पट्टा. माझा धनी मला केव्हां केव्हां सांखळदंडानें बांधून ठेवितो.

लांडगाः—भाऊ, नकोरे नको; मला दोन वेळ खावयालाही नको, व हा गळ्यांतला पट्टाही नको. दोन वेळां खावयास मिळविण्यासाठीं अडकून राहाणें, मला मुळींच आवडणार नाहीं. तुझें सुख तुला लखलाभ असो. मी जातों; राम राम. असें बोलून लांडगा रानांत निघून गेला.

---

धडा ४०

# फुलांचा हार

( " धिन्ना धिन्नक धिन्ना धिन् " ह्या चालीवर )

गुलाब, मोगरा, जाई, जुई ।
सदाफुली ती तशी रुई ॥
जात जातिचीं अशीं फुलें ।
पाहुनियां मन फार भुले ॥ १ ॥
ढवळीं पिवळीं लाल निळीं ।
बहुरंगाचीं तीं सगळीं ॥
सुतांत ओवुनि एक भला ।
हार तयाचा गुंफियला ॥ २ ॥
दिसतो सुंदर किती तरी ।
वास मनाला गुंग करी ॥
आपण सारीं सान मुलें ।
देवा घरचीं अहो फुलें ॥ ३ ॥
हात धरोनि चला चला ।
गुंफूं अपुला हार भला ॥
हा मोठा हा लहानगा ।
असा नसावा भेद बघा ॥ ४ ॥

एकचि रांगे मधें बसूं ।
फुलांसारखे छान दिसूं ॥
शोभा अपुली पाहोनी ।
तोषित होइल देव धनी ॥
हार अपुला वाहुं तया ।
जीवन लावुनि सत्कार्या ॥ ५ ॥

---

धडा ४१

## शक्तीपेक्षां युक्ती अधिक

एका जंगलांत एक सिंह राहात असे. तो त्या जंगलांतील पशूंना मारून खाई. त्यामुळें सर्व पशू अगदीं त्रासून गेले. शेवटीं सर्वांनीं येऊन सिंहाची भेट घेतली, व त्याला सांगितलें "महाराज, आपण आमचे राजे; तेव्हां आम्हांपैकीं एकजण दररोज आपल्याकडे येईल. त्याला आपण मारून खावें; व मग कृपा करून आपण इतरांना त्रास देऊं नये." सिंहानें हें बोलणें कबूल केलें, कारण त्याला खटपटीशिवाय आयतें खावयास मिळणार होतें.

ठरल्याप्रमाणें दररोज एक पशू सिंहाकडे जात असे; मग सिंहही इतर पशूंना त्रास देत नसे. एके दिवशीं एका सशाची सिंहाकडे जावयाची पाळी आली. तेव्हां तो मनांत म्हणाला " आपण तर आज मरणार. मग जीव वांचविण्याची एकादी युक्ती कां करूं नये ? साधली तर साधली, नाहींतर मरावयाचें आहेच." असा विचार करून तो मुद्दाम उशीर करून सिंहाकडे गेला. खावयास उशीर झाल्यामुळें सिंहाला फारच राग आला होता. सशाला पाहातांच तो ओरडून त्याला म्हणाला, " कायरे, इतका उशीर कां केलास ? " ससा म्हणाला, " ह्यांत माझी मुळींच चूक नाहीं. मी तर वेळेवर आपल्याकडे यावयास निघालों; पण वाटेंत दुसऱ्या एका सिंहानें मला अडविलें. मीं आपलें नांव त्यास सांगितलें, तेव्हांतर त्यानें आपणांस शिव्या दिल्या. तो मला सोडीतच नव्हता; पण मी परत येईन अशी शपथ घेतली, तेव्हां त्यानें मला येऊं दिलें. " हें ऐकून त्या सिंहास फारच राग

आला; व तो म्हणाला, " कोठें आहे तो चोर ? मला दाखव. " सशानें त्याला एका खोल विहिरीपाशीं नेलें. व तो म्हणाला, " ती पहा त्याची गुहा. आपल्याला पाहून तो आंत दडून बसला आहे. " सिंहानें आंत पाहिलें, तों स्वतःची पडछाया त्याला दिसली. तो दुसरा सिंह आहे, असें समजून त्यानें मोठी गर्जना केली. त्याबरोबर विहिरींतून जोराचा प्रतिध्वनी आला. तेव्हां चवताळून सिंहानें आंत उडी मारली, व तो पाण्यांत बुडून मेला.

---

धडा ४२

## नसती उठाठेव

एका बगीच्यांत एक घर बांधण्याचें काम चाललें होतें. जागजागीं लोहार, सुतार, पाथरवट वगैरे काम करीत होते. दुपारचे वेळीं सर्व कामकरी जेवणाकरितां घरीं जात. त्यामुळें तास दोन तास काम बंद राही.

एके दिवशीं दुपारच्या वेळीं एक वानरांचा कळप तेथें आला. तेथें एकही मनुष्य नाहीं, असें पाहून त्यांना फार आनंद झाला; व त्यांनीं मोठी गडबड सुरू केली. कोणी विटांवर विटा रचूं लागले; कोणी दगड लोटूं लागले, व कोणी आरी घेऊन लांकूड कापूं लागले. वानरांनीं कारागिरांना अशीं कामें करितांना पाहिलें होतें, व ते त्यांची नक्कल करूं कागले.

तेथेंच एक लांब मयाल पडली होती; व सुतार आरीनें तिच्या दोन फलक्या करीत होता. त्या मिळूं नयेत म्हणून त्यानें तिच्यामध्यें एक मेख मारून ठेविली होती. एक वानर त्या मयालीवर बसून हालवून हालवून ती मेख काढूं लागला. त्याचें शेंपूट भेगेंत गेलें होतें, हें त्याचे लक्षांत आलें नाहीं. मेख निघाल्याबरोबर मयालीचे दोन्ही भाग एक झाले, व त्याचें शेंपूट चेंगरलें; म्हणून तो वानर मोठमोठ्यानें ओरडूं लागला. त्याचें ओरडणें ऐकून शेजारचे लोक धावून आले, व त्यांनीं तुळईंत पुन्हा मेख ठोकून त्याचें शेंपूट बाहेर काढलें.

---

घडा ४३

# फाजील चाकर

एक गृहस्थ बरोबर एक नोकर घेऊन प्रवासास निघाला. एके दिवशीं दुपारीं तो एका नदीच्या कांठीं विसावा घेण्यास थांबला. त्यानें नोकराजवळ चार पैसे देऊन शेजारच्या गांवांतून पेढे आणण्यास सांगितलें, व आपण स्वतः आंघोळ करण्यास नदीवर गेला.

चाकर गांवांत हलवायाचे दुकानीं गेला, व त्यानें चार पैशांचे चार पेढे विकत घेतले. पेढे देतांना हलवाई सहज म्हणाला, " इतर लोकांना मी चार पैशांचे तीनच पेढे देतों; तूं भला मनुष्य दिसतोस, म्हणून तुला चार दिले आहेत. " चाकर ते पेढे घेऊन परत यावयास निघाला. वाटेंत त्यानें विचार केला कीं, " हलवायानें मला म्हणून चार पेढे दिले, वास्तविक चार पैशांचे तीनच पेढे मिळावयाचे. हा चौथा पेढा माझाच आहे, मग तो खाण्यास कोणती हरकत आहे ? " असें म्हणून त्यानें तो पेढा तेथेंच गट्ट केला.

थोडा पुढें गेला, तेव्हां एक पेढा हातांतून सुटून मातींत पडला. चाकरानें विचार केला कीं हा मातीनें भरलेला पेढा धन्याकडे कसा न्यावा, व नेला तरी तो कसा खाईल ? धनी हा पेढा मलाच देईल. तेव्हां तो आतांच खाण्यास काय हरकत आहे ? असा विचार करून त्यानें तो पेढा तोंडांत टाकला.

आणखी पुढें गेल्यावर त्यानें विचार केला कीं, ह्या दोन पेढ्यांपैकीं एक पेढा धनी आपणांस खात्रीनें देईल, कारण तो मोठा भला मनुष्य आहे. मग हा येथेंच खावयास काय हरकत आहे ? असा विचार करून त्यानें तोही पेढा मटकावला.

शेवटीं उरलेला एक पेढा त्यानें धन्याजवळ नेऊन दिला. धन्यानें विचारिलें “ कायरे, चार पैशांचा एकच पेढा आला ? ” तेव्हां चाकरानें सर्व हकीकत सांगितली. तें ऐकून धनी संतापून म्हणाला “ मी साऱ्या दिवसाचा उपाशी, मला टाकून तुला ते पेढे खाववले तरी कसे ? ” चाकर म्हणाला “ पहा, असे खाल्ले ” असें बोलून त्यानें तो पेढाही तोंडांत टाकला. चाकराचा हा फाजी-

लपणा पाहून त्या गृहस्थास इतका राग आला कीं, त्यानें त्याचे चार थोबाडांत मारल्या, व त्याला नोकरीवरून दूर केलें.

---

धडा ४४

## अनुकरण

पूर्वी एका शहरांत एक शेटजी राहात असे. दुसऱ्यावर उपकार करण्यांत त्यानें पुष्कळ पैसा खर्च केल्यामुळें, त्याला गरीबी आली. तेव्हां देवाला त्याची दया आली; व तो त्याला स्वप्नांत दिसला, आणि म्हणाला " मी उद्यां तुझ्या घरीं गोसाव्याचे रूपानें येईन. तूं माझ्या डोक्या-वर सोटा मार, म्हणजे मी सोन्याचा होऊन पडेन. मग तें सर्व सोनें तूं घे. "

दुसरे दिवशीं त्यानें मुलाची हजामत करण्या-करितां एक न्हावी बोलाविला. त्याप्रमाणें तो आला, व हजामत करूं लागला. सकाळीं उठल्या पासून शेटजी रात्रींच्या स्वप्नाबद्दल विचार करी-तच होता इतक्यांत एक गोसावी तेथें आला, व त्याचे पुढें उभा राहिला. शेटजीनें त्याचे

डोक्यावर सोटा मारल्याबरोबर तो सोन्याचा होऊन पडला. ही सर्व गोष्ट न्हाव्यानें पाहिली. शेटजींनें न्हाव्यास २५ मोहोरा बक्षीस दिल्या; व सांगितलें कीं ही गोष्ट कोणापाशीं बोलूं नको.

न्हाव्यानें घरीं गेल्यावर विचार केला कीं, ही पैसा मिळविण्याची उत्तम युक्ती आहे. आपण-ही चार गोसावी घरीं बोलावून त्यांच्या डोक्यावर सोटे मारावे, म्हणजे आपणांला सावकाराच्या चौपट सोनें मिळेल.

असा बेत करून त्यानें दुसऱ्या दिवशीं चार गोसावी घरीं बोलाविले. ते घरांत आल्याबरोबर त्यानें एकदम दार बंद केलें; व सोटा घेऊन तो त्यांचे डोक्यावर मारूं लागला. तेव्हां गोसाव्यांनीं त्या न्हाव्यास पकडून, त्याचे हातांतील सोटा हिसकावून घेतला; व राजाचे कचेरींत जाऊन सर्व हकीकत त्याला सांगितली. राजानें शिपाई पाठवून न्हाव्याला पकडून आणलें, व त्याला विचारिलें "तूं गोसाव्यांना कां मारिलेंस ?" न्हावी म्हणाला "सावकारानें तसें केलें म्हणून मींही तसें केलें," राजानें त्या न्हाव्यास तुरुंगांत पाठविलें.

---

धडा ४५

# कोल्हा व बगळा

एका कोल्ह्यानें एका बगळ्याला आपल्या घरीं जेवावयास बोलाविलें. जेवावयासाठीं खीर केली होती. एका ताटांत खीर घालून तें ताट त्यानें दोघांमध्यें ठेविलें. कोल्हा जिभेनें भराभर खीर चाटून खाऊं लागला. परंतु बगळ्याची चोंच फार लांब असल्यामुळें त्याला ताटांतली खीर खातां येईना. बगळ्याची थट्टा करण्या-साठीं कोल्हा त्याला म्हणाला, "बगळेदादा, तुम्ही खीर कां खात नाहीं? तुम्हांला खीर आव-डत नाहीं काय? खिरींत साखर कमी झाली असेल तर मी आणखी घालतों; पोटभर खा." असें बोलत बोलत त्या लबाड कोल्ह्यानें ताटां-तली सगळी खीर मटकावून टाकली. बग-ळ्याला मुळींच खावयास मिळाली नाहीं; व तो अगदीं उपाशीं राहिला.

घरीं गेल्यावर त्यानें कोल्ह्याची खोड मोड-ण्याचा बेत केला. सुमारें पंधरा दिवसांनीं त्यानें

कोल्ह्याला आपल्या घरीं मेजवानीला बोलाविलें. मेजवानीसाठीं आंबरस केला होता. बगळ्यानें तो एका सुरईंत भरून ती दोघांमध्यें ठेवली; व दोघेजण पिऊं लागले. सुरईचें तोंड अगदीं लहान होतें, व मान लांब होती. बगळा आपली लांब चोंच आंत बुडवून आंबरस भराभर पिऊं लागला. परंतु कोल्ह्याला मुळींच पितां येईना. बगळा कोल्ह्याला चिडविण्यासाठीं म्हणाला, "कोल्हेदादा पोटभर रस प्या; तुम्हांला रस आंबट लागत असेल तर मी त्यांत थोडा गूळ घालतों." असें बोलत बोलत त्यानें सगळा रस पिऊन टाकला; व कोल्हा त्याच्या तोंडाकडे नुसता पहात राहिला. बगळा आपली चोंच बाहेर काढी, त्यावेळेस जे थेंब जमिनीवर सांडत तेवढेच त्यास चाटावयास मिळाले. तो मनांत म्हणाला "मी जर पहिल्यानें बगळ्याची थट्टा केली नसती, तर त्यानें ही आज माझी थट्टा केली नसती."

---

धडा ४६

# शहाणी मुलगी

काशीबाई नांवाची एक बायको होती. तिला गंगू व गोदू ह्या नांवाच्या दोन मुली होत्या, व वसंत ह्या नांवाचा एक तान्हा मुलगा होता. गोदूचा स्वभाव फार गडबड्या होता. आईनें कांहीं काम सांगितलें तर ती लक्ष लावून करीत नसे; कांहीं तरी चुकी करी, व आई बोलली तर उलट तिच्यावरच रागावे. एके दिवशीं दुपारीं काशीबाई तांदूळ निवडीत बसली होती, वसंत बाळ तेथें आंथरुणावर पडून खेळत होता, व गंगू आणि गोदू आपल्या बाहुल्या घेऊन खेळत होत्या. इतक्यांत वसंताला भूक लागल्यामुळें तो रडूं लागला. तेव्हां काशीबाई गोदूला हाक मारून म्हणाली, " गोदू, चुलीवर दूध तापत आहे, त्यांतून एक वाटीभर दूध वसंत बाळा-साठीं घेऊन ये." गोदू खेळांत दंग झाली होती. ती घाईघाईनें चुलीजवळ गेली, व भांड्यांतून वाटींत दूध ओतूं लागली. भांडें नीट न धरल्या-

मुळें तें तिच्या हातांतून निसटून खालीं पडलें व सगळें दूध सांडलें. भांडें पडल्याचा आवाज ऐकून काशीबाई उठून आंत गेली, व पाहाते तों सगळें दूध सांडलें आहे. तेव्हां तिला फार राग आला, व ती म्हणाली, "गोदू, तूं असें कसें दूध सांडलेंस ? आतां वसंताला दूध कोठून मिळेल ?" आईचे हे शब्द ऐकून गोदूला राग आला; व पाय हापटीत हापटीत ती एका खोलींत गेली, व रडत बसली. गंगू हळूच तिच्या मागून तेथें गेली, व तिचे डोळे आपल्या परकरानें पुसून म्हणाली, "ताई, तूं अशी कां रडतेस ? तूं दूध सांडलेंस ह्मणूनच ना आई रागावली ? तुझ्या हातून सगळें दूध सांडलें; आतां बाळाला दूध कोठलें ? तुझ्या हातून अशी चुकी झाली, व तूंच उलटी आईवर रागावतेस ?" असें बोलून तिनें आपल्या परकरानें तिचे डोळे पुन्हां पुसले, व आपल्या जवळचा खडीसाखरेचा एक खडा तिनें तोंडांत घातला. आपल्या धाकट्या बहिणीचे हे शब्द ऐकून गोदूचा राग

गेला, व आपल्या चुकीबद्दल तिला वाईट वाटूं लागलें. ती आपल्या आईजवळ गेली, व तिला म्हणाली, " आई, माझ्या हातून चुकी झाली खरी; परंतु ह्यापुढें मी नीट जपून वागेन, तूं माझ्यावर रागावूं नकोस. " आई म्हणाली, तूं नीट वागलीस तर मी कशाला रागावेन ? जा आतां बाळाला घेऊन खेळव. " असें बोलून ती आपल्या कामाला गेली.

---

धडा ४७

## हत्ती व शिंपी

एका गांवांत एक हत्ती होता. त्याचा माहुत दररोज त्याला पाणी पाजण्यासाठीं नदीवर नेत असे. हत्ती ज्या रस्त्यानें नदीवर जात असे त्या रस्त्यावरच एक शिंप्याचें दुकान होतें. एके दिवशीं रस्त्यानें जातां जातां, तो हत्ती सहज त्या शिंप्याच्या दुकानासमोर उभा राहिला. त्या शिंप्यानें त्याचेजवळ असलेला एक पेरू त्यास दिला. ही गोष्ट त्या हत्तीच्या पक्की ध्यानांत राहून

दुसऱ्या दिवशीं तो नेमका त्या दुकानासमोर उभा राहिला. त्या दिवशींही शिंप्यानें त्यास खावयास दिलें. ह्याप्रमाणें दररोज नदीवर जातांना हत्ती दुकानासमोर उभा राही, व शिंपीही त्याला कांहींतरी खावयास देई. अशी त्या शिंप्याची व हत्तीची पक्की दोस्ती जमली.

एके दिवशीं हत्ती रोजच्याप्रमाणें दुकानासमोर उभा राहिला. परंतु त्या दिवशीं शिंपी कांहीं कारणामुळें फार रागावला होता. तो राग त्यानें हत्तीवर काढला. त्याला कांहीं खावयास देण्याऐवजीं त्यानें आपल्या हातांतली सुई त्याचे सोंडेला टोंचली. हत्तीनें आपली सोंड चटकन मागें घेतली, व तो नदीवर गेला.

पाणी पिऊन झाल्यावर त्यानें चिखलाचें घाणेरडें पाणी सोंड भरून घेतलें, व तो परत फिरला. घरीं जातां जातां तो शिंप्याचे दुकानासमोर उभा राहिला, व त्यानें तें घाणेरडें पाणी शिंप्याचे आंगावर फेंकलें. शिंप्याचें सर्व आंग घाणीनें भरलें, व लोकांनीं त्याचे जवळ शिवावयास

दिलेले उंची कपडेही खराब झाले. हें पाहून शेजारचे सर्व लोक हसूं लागले. त्यामुळें त्या शिंप्याला फारच लाज वाटली. शिवाय खराब झालेल्या कपड्यांची किंमत त्याला भरून द्यावी लागली. ह्याप्रमाणें दोस्ती मोडल्याबद्दल हत्तीनें त्याला चांगली शिक्षा दिली.

---

घडा ४८

## शाळेंत उशिरां येणें

विठू:—कायरे पांडू, शाळेंत यावयास आपणांस थोडा उशीर झाला, तर आपले गुरुजी इतके कां रागावतात ? परवां मला थोडा उशीर झाला, तेव्हां गुरुजी नुसते रागावले नाहींत, तर त्यांनीं मला वर्गाचे बाहेर दाराजवळ उभें केलें. थोडासा उशीर झाला तर काय मोठें नुकसान होतें, तें मला समजत नाहीं.

पांडू:—तूं मला पहिल्यानें सांग कीं गुरुजी सांगतील त्याप्रमाणें वागणें आपल्याला

योग्य नाहीं काय? तूं आपल्या धाकट्या भावाला कांहीं काम सांगितलेंस, व त्यानें तुझें ऐकलें नाहीं, तर तुला राग येईल कीं नाहीं ?

विठूः—मला खचित राग येईल व मी त्याला एखादी चापटसुद्धां मारीन.

पांडूः—मग गुरुजी तर आपल्या बापासारखे तेव्हां त्यांनीं सांगितलेलें आपण न ऐकल्यामुळें त्यांना राग आला, तर त्यांत नवल काय ? मी म्हणतों कीं गुरुजींनीं त्या दिवशीं तुला नुसतें दाराशीं उभें केलें, ही त्यांनीं थोडीच शिक्षा केली, तुला नेहमीं उशीर होतो तेव्हां त्यांनीं तुला दोन छड्या मारल्या असत्या, तरीसुद्धां तुझ्या अपराधाला ती शिक्षा योग्य झाली असती.

विठूः—गुरुजींनीं सांगितलेलें आपण ऐकलें पाहिजे ही गोष्ट खरी; पण थोडासा उशीर झाला, तर नुकसान काय होतें तें मला समजत नाहीं.

पांडूः—कां बरें नुकसान कसें होत नाहीं ? तूं येण्याच्या अगोदर गुरुजींनीं जें शिकविलें, तें तुला पुन्हां कोण शिकवील? शिवाय तूं मध्येंच आल्यामुळें दुसऱ्या मुलांचें लक्ष तुजकडे लागून, तीं तुझ्याकडे पाहूं लागलीं व त्यामुळें गुरुजींना शिकवितांना मध्येंच थांबावें लागलें. उशिरां आल्यामुळें तुझें तर नुकसान झालेंच, पण तुझ्याबरोबर इतरांचेंही नुकसान झालें; हें ठीक झालें काय ?

विठूः—थोडा उशीर झाला तरी गुरुजी कां रागावतात, हें आतां मला समजलें. मी इतके दिवस ह्या गोष्टीचा विचारच केला न्हवता. ह्यापुढें मी केव्हांही उशिरां येणार नाहीं.

पांडूः—शाबास, तूं अशा रीतीनें वागशील तर गुरुजींना फार बरें वाटेल, व तुझाही फायदा होईल.

———

